**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन योजनेस (SHM) प्रशासकीय मान्यता व निधी वितरण करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक: योजना ३३२१/प्र.क्र.१०६/१अे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०२१.

**वाचा** :-१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक २-२/२०१८-Fert.Use, दिनांक १०.०६.२०२०.

३) कृषि व पदुम, शासन पत्र क्रमांक संकीर्ण १६२१/प्र.क्र.०३ दि.१२/०२/२०२१.

४) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र.२-२/२०१८/Fert. Use, दि.०४.०८.२०२०.

५) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक २-१/२०२०-Fert.Use, दिनांक २९.०४.२०२१. .

६) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक २-१/२०२०-Fert.Use, दिनांक-२९.०४.२०२१.

७) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक कृआ/मृसमृचा/ शा.स्थामृचाप्र/ १७४९०/२०२१, दिनांक ०३.०६.२०२१.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१४-१५ पासून राबविण्यात येत आहे. सन २०१५-१६ पासून सदर योजना केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत फिरती/ स्थायी मृद चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करणे, शासकीय मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, खत नियंत्रण चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे इत्यादी घटक राबविण्यात येतात.

सन २०२०-२०२१ मध्ये राज्यामध्ये मृद आरोग्य व्यवस्थापन योजना राबविण्याकरीता केंद्र शासनाने दिनांक १०.०६.२०२० च्या पत्रान्वये एकुण रू.७६.५० लाख रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास मंजूरी दिलेली होती. यामध्ये केंद्र हिस्सा (६०%) रू.४५.९० लाख इतका असून राज्य हिस्सा (४०%) रू.३०.६० लाख इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे. मृद आरोग्य व्यवस्थापन योजनेअंतर्गत नंदूरबार येथे नवीन शासकीय स्थायी प्रयोगशाळा स्थापन करण्यास दिनांक १२.०२.२०२१ च्या पत्रान्वये शासनाने मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाने दिनांक ०४.०८.२०२० च्या पत्रान्वये सदर योजनेकरीता ७५% निधी केंद्र हिस्सा रु.३४.४३ लाख इतका निधी उपलब्ध करुन दिलेला होता. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात प्रयोगशाळा स्थापनेस अवधी असल्याने सदर निधीचे वितरण करण्यात आलेले नव्हते. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सदर निधी खर्च झालेला नसल्याने निधी पुनर्जिवित करण्याबाबतचा प्रस्ताव केंद्र शासनास पाठविण्यात आला होता. केंद्र शासनाने दिनांक २९.०४.२०२१ च्या पत्रान्वये सदरचा निधी पुनर्जिवित करुन खर्च करण्यास सहमती दर्शविली आहे. उपरोक्त बाब विचारात घेता राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) ही केंद्र पुरस्कृत योजनेस सन २०२१-२२ करीता प्रशासकिय मान्यता व निधी वितरण करण्याची बाब शासनास विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन हे उपअभियान सन २०२१-२०२२ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्सा (६० टक्के) रु.४५.९० लाख व राज्य हिस्सा (४० टक्के) रु.३०.६० लाख असा एकूण रु.७६.५० लाख (रु.शहात्तर लाख पन्नास हजार फक्त) एवढया रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**सदर कार्यक्रमातंर्गत घटकनिहाय भौतिक व आर्थिक लक्ष पुढील प्रमाणे राहील:-**

| अ.क्र. | घटक | दर | भौतिक | आर्थिक | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०% | |
| १ | नंदुरबार येथे स्थायी प्रयोगशाळा स्थापन करणे | ७६.५० | ०१ | ४५.९० | ३०.६० | ७६.५० |

२. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियांनातर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन हे उपअभियान राबविण्याकरीता केंद्र हिस्सा रु.३४.४३ लाख आणि राज्य हिस्सा रु.२२.९५ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदरचा निधी केंद्र हिस्सा वर्षात केंद्र हिश्शा करीता लेखाशिर्ष क्र. २४०२१०४६ आणि राज्य हिश्शाकरीता लेखाशिर्ष क्र.२४०२ए०१२ या तरतुदीमधुन खर्च करण्यात यावा.

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे-

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक /तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची

जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ व शासन निर्णय क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६३/२०२१/व्यय-१, दिनांक २६.०८.२०२१ रोजी मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१०९०७१६१०१६५८०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2021.09.07 16:15:03 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.